संसद व विधीमंडळाच्या माजी सदस्यांना
सन्मानाची व सौजन्याची वागणूक देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण- २०१५ / प्र. क्र. ८१ / १८ ( र. व का. )**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७ एप्रिल, २०१७

वाचा : १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : विमंस २०१३ / प्र. क्र. ६७ / १८ (र. व का.), दिनांक २७ जुलै, २०१५.

**परिपत्रक :**

संसद सदस्य / विधानमंडळ सदस्यांना सन्मानाची व सौजन्याची वागणूक देणे, त्यांचेकडून आलेल्या पत्र / अर्ज / निवेदनांवर सत्वर कार्यवाही करणे इ. संदर्भात सर्वंकष सूचना संदर्भाधीन दिनांक २७ जुलै, २०१५ च्या शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

सदरहू परिपत्रकातील तरतूदीनुसार संसद सदस्य व विधीमंडळाच्या माजी सदस्यांनासुद्धा सन्मानाची व सौजन्याची वागणूक देण्याबाबतच्या तरतूदी विहित करण्याची बाबत शासनाच्या विचाराधीन होती. सबब यान्वये सर्व विभाग / कार्यालये यांना सूचित करण्यात येते की, शासकीय लोकोपयोगी / विकासात्मक कामांच्या भूमिपूजनाच्या / पायाभरणीच्या / शुभारंभाच्या / उद्‌घाटनाच्या इ. कार्यक्रमाच्या वेळी दिनांक २७ जुलै, २०१५ च्या परिपत्रकातील परिच्छेद २ मध्ये उल्लेख केलेल्या व्यक्तींसोबतच संबंधित मतदारसंघातील माजी संसद सदस्य आणि विधीमंडळाच्या माजी सदस्यांनासुद्धा निमंत्रित करण्यात यावे व त्यांना व्यासपीठासमोरील अतिमहत्त्वाच्या व्यक्तींसाठी आरक्षित असलेल्या आसनांवर उचित स्थान द्यावे. राज्य शासनाच्या सर्व विभागांनी / कार्यालयांनी सदर सूचनांचे / आदेशांचे काटेकोरपणे पालन केले जाईल, याची दक्षता घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेताक २०१७०४२५११३३३४७५०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sumit Mullick
Date: 2017.04.26 15:42:26
+05'30'

( सुमीत मल्लिक )
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,
मा. राज्यपालांचे सचिव ( ५ प्रती ),

मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव (५ प्रती),
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
मा. महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य,
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
प्रबंधक , लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय,
सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख /
प्रादेशिक प्रमुख / कार्यालय प्रमुख,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती),
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती (कार्यासन १८).